मोटार अपघात दावा क्र.११९/२०२३, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, धाराशिव विरुद्ध श्रीम. गायत्री भांडे व इतर.

---

शासकिय वाहन क्र. एम.एच.२५ सी. ७०७० या वाहनाच्या अपघात प्रकरणी रु. ३४,९१,७१२/- एवढी नुकसान भरपाईची रक्कम District Judge-१ Member MACT, Kalam Dist. Dharashiv येथे अनामत रक्कम म्हणुन जमा करण्यास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सकआ २०२४/प्र.क्र.२३/आस्था-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० जुलै, २०२४.

**वाचा** - १) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्रमांक सकआ /विधी/बदली /एम.ए.सी.पी.क्र.११९ / २०२३/२०२४/पुणे,/१९४, दिनांक १६.०१.२०२४.

२) मा. मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, कळम, जिल्हा धाराशिव यांचे दावा क्र. ११९/२०२३ प्रकरणी दिनांक २५.०५.२०२३ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना :-**

आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्या आस्थापनेवरील सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, धाराशिव यांच्या नावे असलेले वाहन क्रमांक एम.एच.२५ सी.७०७० या वाहनाचा दिनांक १९.०७.२०१९ रोजी श्री. रजियोद्दीन गयसोद्दीन काझी, वाहन चालक हे वाहन चालवत असताना अपघात झालेला आहे. सदर अपघातामध्ये श्री. विक्रांत सुभाष भांडे, रा. मोमीन, ता. कळब, जि. धाराशिव हे मयत झाले आहेत. त्यानुषंगाने श्रीम.गायत्री भांडे, ( मयत श्री. विक्रांत भांडे यांच्या पत्नी ) व इतर यांनी मा. मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, कळम, जिल्हा धाराशिव येथे भरपाई मिळणेबाबत दावा दाखल केला होता. सदर दाव्याचा निकाल श्रीम. गायत्री भांडे व इतर यांच्या बाजुने लागल्याने संबंधितांना नुकसान भरपाई रक्कम रु.२६,०९,००० /- + ७ % ( दावा दाखल केल्याच्या दिनांकापासुन म्हणजेच दिनांक १८.०९.२०१९ पासुन ) व्याज देण्याबाबत मा. मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, कळम, जिल्हा धाराशिव यांनी दिनांक २५.०५.२०२३ रोजी आदेश पारित केले आहेत.

२. उक्त आदेशाच्या अनुषंगाने आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वाचा क्र.१ अन्वये रु.२६,०९,००० /- + ७ % ( दावा दाखल केल्याच्या दिनांकापासुन म्हणजेच दिनांक १८.०९.२०१९ पासुन ) व्याजासहीत रक्कम मा. न्यायाधिकरणात जमा करण्यासाठी मंजुरी मिळण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने नुकसान भरपाई रक्कम रु.२६,०९,००० /- व त्यावर दावा दाखल केल्याच्या दिनांकापासुन म्हणजेच दिनांक १८.०९.२०१९ पासुन दिनांक १८.०७.२०२४ पर्यंत ( एकुण ५८ महिने ) ७ % व्याजाची रक्कम रु. ८,८२,७१२ /- अशी एकुण रक्कम रु.३४,९१,७१२ /-इतकी नुकसान भरपाईची रक्कम मोटार वाहन अपघात दावा

क्र.११९/२०२३ अन्वये District Judge-१ Member MACT, Kalam Dist. Dharashiv येथे अनामत रक्कम म्हणुन जमा करण्याकरीता मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा. मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, कळम, जिल्हा , धाराशिव यांनी आदेशित केल्यानुसार मूळ रक्कम रु.२६,०९,००० /- व त्यावरील ७ % ( दिनांक १८.०९.२०१९ पासून दिनांक १८.०७.२०२४ पर्यंत एकुण ५८ महिने ) व्याजाची रक्कम रु. ८,८२,७१२ अशी मिळून एकूण रु.३४,९१,७१२/- (अक्षरी रुपये चौतीस लाख एक्यान्नव हजारसातशे बारा फक्त ) इतकी नुकसान भरपाईची रक्कम, मोटर वाहन अपघात दावा क्र. ११९/२०२३ अन्वये District Judge-१ Member MACT, Kalam Dist. Dharashiv येथे शासकीय वाहन क्र. एम.एच.२५ सी.७०७० च्या अपघाताच्या अनुषंगाने अनामत रक्कम म्हणून जमा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च “मागणी क्र.एन-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५-(०१) अनुसूचित जातीचे कल्याण, ००१-संचालन व प्रशासन, (०१) समाज कल्याण संचालनालय (मागासवर्ग शाखा), (०१) (०१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग (अनिवार्य), २२२५ ००९२, १३-कार्यालय खर्च या लेखाशिर्षातून सन २०२४-२५ वित्तीय वर्षाच्या उपलब्ध निधीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उपविभाग चार मधील अनुक्रमांक पाच मधील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७३०१२१६१२३९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH M
KHAIRMODE

Digitally signed by SATISH M KHAIRMODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=a6351a2e14339ed095cda2a544af43de4b681afa9a5b92d3ad62ec4726ebebab, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=79208454FA5609FCBFBE8A59A44EC2402F387AA627CD8748B6D2CFDDF68B76C6, cn=SATISH M KHAIRMODE
Date: 2024.07.30 18:03:15 +05'30'

**( सतीश खैरमोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२. महालेखापाल लेखापरीक्षा ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर
३. सह सचिव (आस्था-२) सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, लातुर
५. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, धाराशिव
६. सचिव ( सा. न्या. ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. जिल्हा कोषागार कार्यालय, धाराशिव
८. निवडनस्ती